**विदर्भ व मराठवाडा दुग्ध विकास प्रकल्पांतर्गत अतिरिक्त प्रकल्प संचालक या पदाचा अतिरिक्त कार्यभार डॉ.सतिश राजू, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, भंडारा यांचेकडे सोपविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :सकिर्ण-२०१८/प्र.क्र.१५५/पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा** :- प्रकल्प संचालक, विदर्भ व मराठवाडा दुध विकास प्रकल्प, नागपूर यांचे पत्र क्र.प्रसं/
(वि.प्र)/आस्था/१८७/२०१८, नागपूर यांचे दि.२७.०९.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

विदर्भ व मराठवाडा दुग्ध विकास प्रकल्पांतर्गत सुरू असलेल्या विविध कामांची व्याप्ती दिवसेंदिवस वाढत आहे. परंतु या प्रकल्पासाठी प्रत्यक्षात मनुष्यबळ कमी प्रमाणात आहे. डॉ.सतिश राजू, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, भंडारा या पदावर कार्यरत असून, त्यांनी यापूर्वी प्रकल्प संचालक, विदर्भ व मराठवाडा दुग्ध विकास प्रकल्पाचे कामकाज पाहिलेले आहे. त्यामुळे सदर प्रकल्पात चालणा-या विविध कामांचा त्यांना अनुभव असल्याने, तसेच, प्रकल्पाचे कामकाज अधिक गतीने व परिणामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने अतिरिक्त प्रकल्प संचालक, विदर्भ व मराठवाडा दुग्ध विकास प्रकल्प या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अतिरिक्त प्रकल्प संचालक, विदर्भ व मराठवाडा दुग्ध विकास प्रकल्प, या पदाचा अतिरिक्त कार्यभार डॉ.सतिश राजू, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, भंडारा यांच्याकडे सोपविण्यात येत आहे. सदर प्रकल्पांतर्गत अतिरिक्त प्रकल्प संचालक असे पद मंजूर नसल्याने डॉ.राजू यांचे वेतन व भत्ते सध्या ते ज्या पदावर कार्यरत आहेत, त्याच पदावर आहरित करण्यात यावेत. तसेच, अतिरिक्त प्रकल्प संचालक या पदाचा अतिरिक्त कार्यभार त्यांच्याकडे सोपविल्यामुळे त्यांना कोणतेही अधिकचे भत्ते वा विशेष वेतन देय होणार नाही.

२. डॉ.राजू, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, भंडारा यांनी अतिरिक्त प्रकल्प संचालक, विदर्भ व मराठवाडा दुग्ध विकास प्रकल्प, या पदाचा अतिरिक्त कार्यभार तात्काळ स्विकारून तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२९१५३२२७२७०१ असा आहे. सदरचे शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2018.10.29 15:40:01 +05'30'

( रविंद्र गुरव )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.
९. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. विभागीय आयुक्त, नागपूर, अमरावती व औरंगाबाद.
११. जिल्हाधिकारी, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, कुक्कुट प्रक्षेत्र आवार, कृषी नगर, जुना आर.टी.ओ.रोड, अकोला.
१४. उप सचिव, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. उप सचिव, दुग्धव्यवसाय विकास, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. महाव्यवस्थापक, राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ, पश्चिम द्रुतगती महामार्ग, गोरेगाव (पू), मुंबई.
१७. प्रकल्प संचालक, विदर्भ व मराठवाडा दुग्धविकास प्रकल्प द्वारा, मदर डेअरी, सिव्हील लाईन्स, नागपूर.
१८. महाराष्ट्र राज्य सहकारी दुध संघ (महानंद), गोरेगाव (पू), मुंबई.
१९. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, नागपूर, अमरावती, औरंगाबाद व लातूर विभाग.
२०. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, नागपूर, अमरावती, औरंगाबाद व लातूर विभाग.

२१. डॉ.सतिश राजू, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, भंडारा

२२. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद.

२३. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद.

२४. जिल्हा दुग्ध विकास अधिकारी, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद.

२५. निवडनस्ती पदुम-४.